मुख्यमंत्री धर्मादाय देणगी निधीमधून अर्थसहाय्य
मंजूर करणेबाबत.
भारतीय उत्कर्ष मंडळ, जि.नागपूर

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांक-सीसीएफ-२०१७/प्र.क्र. ११५/२०१७/२५
मुख्य इमारत, ३ रा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १५ जानेवारी, २०१९

वाचा -
१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. पीडीसी-१०६९-१३५१४-बी, दि. २७/०८/१९६९
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. पीडीसी-१०६९/१३५१४-बी, दि. ०८/१०/१९७०
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.सीसीएफ-२०१४/प्र.क्र.८८/२०१४/२५ दि.४/३/२०१७
४) शासन शुध्दीपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.सीसीएफ-२०१४/प्र.क्र.८८/२०१४/२५ दि.२७/९/२०१७

शासन निर्णय -

मुख्यमंत्री धर्मादाय देणगी निधीचे संपूर्ण नियंत्रण, व्यवस्थापन व प्रशासन मा. मुख्यमंत्री महोदय यांच्याकडे निहीत आहे. मुख्यमंत्री धर्मादाय देणगी निधीमधून महाराष्ट्र राज्यातील किंवा राज्याबाहेरील सामाजिक, शैक्षणिक, सांस्कृतिक, धर्मादाय किंवा तत्सम सार्वजनिक किंवा निम सार्वजनिक संस्था किंवा संघटना यांना, या निधीतून मा.मुख्यमंत्री यांच्या स्वेच्छानिर्णयानुसार अर्थसहाय्य देण्यात येते. त्यानुसार भारतीय उत्कर्ष मंडळ, जि.नागपूर या संस्थेस रुपये ५ लक्ष इतक्या अर्थसहाय्यास मंजूरी दिली आहे. त्यानुषंगाने भारतीय उत्कर्ष मंडळ, जि.नागपूर या संस्थेस रुपये ५ लक्ष (अक्षरी रुपये पाच लक्ष फक्त ) इतके अर्थसहाय्य याद्वारे मंजूर करण्यात येत आहे.

२. भारतीय उत्कर्ष मंडळ, जि.नागपूर या संस्थेस **उत्कर्ष विद्या मंदिर, नागपूर या विनाअनुदानित शाळेसाठी शासकीय कारागृहातून बेंचेस बनवून घेण्याच्या अटीच्या अधीन राहून बेंचेस खरेदी करण्यासाठी रुपये ५ लक्ष इतके अर्थसहाय्य मंजूर करण्यात आले आहे.** संस्थेस ज्या प्रयोजनार्थ अर्थसहाय्य मंजूर करण्यात आले आहे, त्याच प्रयोजनासाठी सदर निधी खर्च करावा आणि खर्चाच्या अनुषंगाने “सनदी लेखापाल” (Chartered Accountant) यांनी प्रमाणित केलेले उपयोगिता प्रमाणपत्र, निधी प्राप्त झाल्यानंतर एक वर्षात सादर करावे. तसेच सदर संस्थेने नियमानुसार लेखापरिक्षण करुन घेऊन लेखापरिक्षण अहवाल देखील शासनास सादर करावा.

३. सदर निधी वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-१०१०/प्र.क्र.६८/कोषा प्र-५, दि.१८ एप्रिल, २०११ मधील तरतुदीस अनुसरुन मुख्यमंत्री धर्मादाय देणगी निधीच्या स्वीयप्रपंजी (PLA) लेखा खात्यामधून

भारतीय उत्कर्ष मंडळ, जि.नागपूर या संस्थेच्या बँक ऑफ इंडिया, जि. नागपूर बचत खाते क्र. ८७२२१०१०००१३७७० मध्ये विहीत कार्यपद्धतीनुसार जमा करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय संदर्भाधीन दि. २७/०८/१९६९, दि ८/१०/१९७०, व दि.४/३/२०१७ च्या शासन निर्णयातील व दि.२७.९.२०१७ च्या शासन शुध्दीपत्रकातील तरतूदीनुसार मा. मुख्यमंत्री महोदय यांच्या मंजूरी नंतर निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०११५१६३४२९९४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरी साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ujjwala Vinayak Pharande

Digitally signed by Ujjwala Vinayak Pharande
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7598aba6fcd2935da29ab3c2b3156a82e243b7c8f01aeade5ee81d21f19e8315, serialNumber=70bde76ab0df1e2787a27ac7b7a7f156f938de5b9bab0b9c4f943cf57a2d2cc7, cn=Ujjwala Vinayak Pharande
Date: 2019.01.15 17:28:22 +05'30'

**(उ. वि. फरांदे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई
३) महालेखापाल, महाराष्ट्र (१/२), लेखा व अनुज्ञेयता, मुंबई / नागपूर
४) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
५) निवासी लेखाधिकारी, मुंबई,
६) उप सचिव (कोषा प्र-५/ अर्थ-३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७) सहाय्यक धर्मादाय आयुक्त, मुख्यमंत्री यांच्या सचिवालया समोर, सिव्हिल नाईन्स, जि.नागपूर-४४० ००१
८) अध्यक्ष, भारतीय उत्कर्ष मंडळ, वर्धा रोड, खापरी, ता.नागपूर, जि.नागपूर-४४१ १०८
९) निवडनस्ती. (का-२५)